**राज्यसेवा (मुख्य) परिक्षा-२०१४ च्या अंतिम निकालाच्या आधारावर महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या राज्य उत्पादन शुल्क विभागातील उमेदवारांच्या परिविक्षाधीन प्रशिक्षण कालावधीकरिता अधिसंख्य पदे निर्माण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः इएसटी-२७१५/प्र.क्र.८२/राऊशु-१,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक : १ जून, २०१५.

वाचा :- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन २०१५/प्र.क्र.४६/१४/१८-ब, दि. १७.०४.२०१५.

राज्यसेवा मुख्य परिक्षा-२०१४ च्या अंतिम निकालाच्या आधारे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने उप अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क (गट ब) या संवर्गातील दोन पदाकरीता तसेच सहायक आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क (गट ब) या संवर्गातील एका पदाकरीता उमेदवारांची शिफारस केली आहे. दि.२.०५.२०१५ पासून वनामती, नागपूर या संस्थेमध्ये सामान्य प्रशासन विभागामार्फत या उमेदवारांचे एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण सुरु करण्यात आले आहे. त्याअनुषंगाने राज्य उत्पादन शुल्क विभागातील गट ब संवर्गासाठी उपरोक्त नमूद ३ पदांवरील उमेदवारांचे प्रशिक्षण पूर्ण होईपर्यंतच्या कालावधीसाठी (दोन वर्ष) अधिसंख्य पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय** :

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या राज्य उत्पादन शुल्क विभागातील उमेदवारांच्या प्रशिक्षणाकरीता उपअधीक्षक, राउशु (गट-ब) (वेतनश्रेणी रु. ९३००-३४८००, ग्रेड वेतन रु. ४४००/-) या संवर्गातील दोन व सहायक आयुक्त, राउशु, (गट-ब) (वेतनश्रेणी रु. ९३००-३४८००, ग्रेड वेतन रु. ४४००/-) या संवर्गातील एक याप्रमाणे एकूण तीन अधिसंख्य पदे दि. ०२.०५.२०१५ पासून दोन वर्षाच्या कालावधीकरिता निर्माण करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर अधिसंख्य पदे आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात येत आहे.

३. सामान्य प्रशासन विभागाने संदर्भाधिन शासन निर्णयान्वये निर्देशित केल्यानुसार परिविक्षाधीन प्रशिक्षण कालावधीत गट-अ संवर्गातील उमेदवारांना रु. ३०,०००/- आणि गट ब संवर्गातील

उमेदवारांना रु. २०,०००/- या मासिक ठोक रकमेसाठी संबंधीत विभागांनी अनुक्रमे यशदा, पुणे आणि वनामती, नागपूर यांना उमेदवारांच्या संख्येनुसार अग्रिम निधी उपलब्ध करुन द्यावयाचा आहे. त्याअनुषंगाने उपअधीक्षक, राउशु (गट ब) व सहायक आयुक्त, राउशु (गट-ब) या संवर्गातील अनुक्रमे दोन व एक याप्रमाणे एकुण तीन उमेदवारांना दोन वर्षाच्या प्रशिक्षण कालावधीत ठोक रक्कम अदा करण्यासाठी येणाऱ्या एकूण रु १४,४०,०००/- (रुपये चौदा लाख चाळीस हजार फक्त) एवढ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. उपरोक्त प्रशिक्षण संस्थांमध्ये प्रत्यक्ष उपस्थित उमेदवारांच्या संख्येनुसार दि.२.०५.२०१५ ते दि.१६.०८.२०१५ या कालावधीतील वेतनापोटी अग्रिम निधी प्रशिक्षण संस्थेला उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी करावी. तसेच व्यावसायिक खातेनिहाय प्रशिक्षण कालावधीत सदर निधी संबंधित उमेदवाराला अदा करण्याची अन्य व्यवस्था देखील त्यांनी करावी .

४. संबंधित अधिकाऱ्यांचे वेतन व भत्ते ज्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात येतात त्याच लेखाशिर्षाखाली प्रस्तुत प्रकरणी येणारा खर्च टाकून तो त्या-त्या वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २४९/१५/व्यय-८, दि.१२.०५.२०१५ व १२८/विसु-१, दि. १६.०५.२०१५ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६०२११५७२०३०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ankush S Gharge

Digitally signed by Ankush S Gharge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ankush S Gharge
Date: 2015.06.02 11:58:18 +05'30'

(**अं. शा. घार्गे**)

सह सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल-१, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई
२. महालेखापाल-१, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई

३. महालेखापाल-१, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, नागपूर

४. महालेखापाल-१, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.

५. अप्पर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई

६. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रबोधिनी, राजवभवन आवार, बाणेर रस्ता, पुणे

७. महासंचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, वनामती बोले पेट्रोल पंप जवळ, अमरावती रोड, धरमपेठ, नागपूर-४४२ ४१०

८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

९. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई

१०.सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई

११.जिल्हा कोषागार कार्यालय, नागपूर

१२.कार्यासन क्र. व्यय-८ व वित्तीय सुधारणा-१, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

१३.निवडनस्ती